(५)

२०११०३१०१५४५५४००१

**पुणे महानगरपालिका**
श्री.ल.रा.डामसे यांची उपायुक्त या पदावरील नियुक्ती नियमित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीएमसी ३०२००१/२७४६/प्र.क्र.२६/०३/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- ८ ऑगस्ट, २००७**

**वाचा :-** (१) आयुक्त, पुणे मनपा, पुणे यांचे पत्र क्र.उआ/से/२१६८, दि.२० नोव्हेंबर,२००१ व त्यासोबतचा मनपा ठराव क्र.४४७, दिनांक २२/१०/२००१
(२) उपायुक्त, पुणे मनपा, पुणे यांचे पत्र क्र.उआ/से/५५०, दि.३०/५/२००२
(३) उपायुक्त, पुणे मनपा, पुणे यांचे पत्र क्र.उआ/से/२२४९, दि.२/१/२००३
(४) उपायुक्त, पुणे मनपा, पुणे यांचे पत्र क्र.उआ/से/२३८३, दि.२९/१/२००४
(५) उपायुक्त, पुणे मनपा, पुणे यांचे पत्र क्र.उआ/से/७२/दि.१३/४/२००४
(६) सह आयुक्त,पुणे मनपा, पुणे यांचे पत्र क्र.सहमआ/खाचौवि/२२७४, दि.१/३/२००७ व त्यासोबतचे आयुक्त, पुणे मनपा, पुणे यांचे क्र.म/सहमआ/से/१४७३, दि.२०/१०/२००६ चे इ आज्ञापत्र

**प्रस्तावना :**

पुणे महापालिकेच्या आस्थापनेवरील उपायुक्त संवर्गातील पदावर महापालिकेतील कामगार कल्याण अधिकारी श्री.ल.रा.डामसे यांच्या नेमणुकीस महापालिका ठराव क्र.४४७, दिनांक २२/१०/२००१ अन्वये महापालिकेने मान्यता दिलेली आहे. श्री.डामसे यांना उपायुक्त (गवनि) या पदावर दि.१४/२/२००१ पासून महापालिका स्थायी समितीच्या ठरावानुसार नियुक्ती देण्यात आली होती. त्यास मनपा महासभा ठराव क्र.४४७ अन्वये मान्यता दिलेली आहे. सदरील ठरावास अनुसरुन आयुक्त, पुणे महापालिका, पुणे यांनी श्री.ल.रा.डागसे यांची उपायुक्त या पदावरील नियुक्ती नियमित करण्याबाबतचा प्रस्ताव मुंबई प्रांतिक महापालिका अधिनियम,१९४९ चे कलम ४५ (४) अन्वये शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर प्रस्तानुषंगाने आयुक्त, पुणे मनपा, पुणे यांच्याकडून वेळोवेळी पूरक माहिती उदा :- आस्थापना खर्च, श्री.ल.रा.डामसे यांचे ५ वर्षांचे गोपनीय अहवाल संदर्भाधीन पत्रान्वंये महापालिकेकडून प्राप्त करुन घेण्यात आले आहेत. तसेच श्री.ल.रा.डामसे यांच्याविरुध्दच्या विभागीय चौकशीच्या अनुषंगाने अंतिम निष्कर्षांची माहिती देखील मनपाकडून प्राप्त करुन घेण्यात आलेली आहे. सदरील माहिती संदर्भाधीन पत्रान्व्यये शासनास सादर करताना मनपा प्रशासनाने उपायुक्त या पदावरील नियुक्ती नियमित करण्याबाबत शासनास विनंती केली आहे. त्यामुळे श्री.ल.रा.डामसे यांची उपायुक्त या पदावरील नियुक्ती नियमित करण्याच्या आयुक्त, पुणे महापालिका, पुणे यांच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :--

पुणे महानगरपालिकेच्या उपायुक्त संवर्गातील पदावर श्री.लक्ष्मण रामभाऊ डामसे यांची नियुक्ती नियमित करण्याच्या आयुक्त, पुणे महानगरपालिका यांच्या प्रस्तावास, महापालिका ठराव, आस्थापना खर्च आणि श्री.ल.रा.डामसे यांचे गोपनीय अहवाल विचारात घेऊन मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५(४) अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशांनुसार व नांवाने,**

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
मा.प्रधान सचिव, नगर विकास यांचे स्वीय सहाय्यक,
आयुक्त, पुणे महानगरपालिका,पुणे.
सह आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे,
निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.